# दर्यास पालाण राजियांनी घातले!

छत्रपती शिवाजी महाराजांच्या चरित्रातील अनेक घटना आजही आपल्याला चकित करतात. त्यांपैकी काही घटनांनी अनेक सामाजिक व राजकीय बदल झाले व ते आजही जाणवतात. त्यापैकी सर्वांत महत्त्वाची घटना म्हणजे 'स्वतंत्र आरमाराची उभारणी!'



अनिकेत अंकुश यादव
aniketyadav84@gmail.com

शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील विस्मयकारक घटना, त्यांनी केलेले पराक्रम पाहिल्यास त्याचा अधिक विचार न करता आपण त्यांना देवत्व बहाल करून टाकतो. मात्र, आपण जाणुनबुजून विसरतो की, लोककल्याणाचा विचार करताना त्यांना अगणित अडचणींचा सामना करावा लागला. आरमाराचीच उभारणी करताना त्यांना सुंदोपसुंदी, रुढी-परंपरा व कर्मठांचा त्रास सहन करावा लागलाच, त्याचबरोबर तंत्रज्ञान, कुशल कारागीर, साधने यांचा अभाव, सिद्दीचा हैदोस, युरोपियन समुद्री शत्रू यांसही तोंड द्यावे लागले. या सर्वांवर मात करून त्यांनी आपले उद्दिष्ट पूर्ण केले. अनेक वर्षांपासून विस्मृतीत गेलेले नौकानयनाचे शास्त्र छत्रपती शिवाजी महाराजांनी पुनरूज्जीवित केले, यामुळेच शिवाजी महाराजांना 'भारतीय आरमाराचे जनक' म्हणून गौरविले जाते.

प्राचीन आरमारी परंपरा असूनही चोल राजांनंतर त्याकडे जाणीवपूर्वक लक्ष देणारा राजा येथे राहिला नव्हता. ही बाब इ.स. १४९८मध्ये भारतात व्यापारानिमित्त आलेल्या पोर्तुगिजांनी हेरली. अगदी मोजक्या संख्येने येथे आलेल्या पोर्तुगिजांनी इ.स. १५१०मध्ये गोव्यात आपली राजधानी केली आणि हिंदी महासागर, अरबी समुद्र यांवर आपला मालकी हक्क प्रस्थापित केला. पुढे इंग्रज, फ्रेंच, डच, डेन हे देखील व्यापारानिमित्त आले आणि त्यांनी आपले हातपाय भारतामध्ये पसरविण्यास सुरवात केली. यापैकी इंग्रजांनी भारतीयांच्या कमतरतांचा सखोल अभ्यास करून १५० वर्षे राज्यही केले. एवढेच काय, तर आफ्रिकेहून गुलाम म्हणून आलेल्या सिद्दींनी देखील अनेक वर्षे येथे राज्य केले. कारण (अनेक कारणापैकी महत्त्वाचे एक म्हणजे) आपल्याकडे लढाऊ आरमार नव्हते.

## जहाजबांधणीची सुरवात...

शिवपूर्व व शिवकाळामध्ये देखील हिंदी महासागर व अरबी समुद्रावर युरोपियनांचेच प्राबल्य होते. अगदी मुघलांना देखील त्यांच्याकडून अटीशर्तीसह परवाने घ्यावे लागत असत. इ.स. १६५६मध्ये शिवाजी महाराजांनी जावळी घेतली आणि कोकणातील बराचसा भाग स्वराज्यात सामील झाला. यावेळी सिद्दीच्या अन्यायाच्या असंख्य तक्रारी महाराजांच्या कानी आल्या. त्यामुळे मराठ्यांनी सिद्दीविरुद्ध प्रचंड मोठी आघाडी उघडली. मात्र, सिद्दीकडील आरमारामुळे त्याला जेरीस आणणे अशक्य झाले होते. त्यामुळे महाराजांना आरमाराची आवश्यकता भासू लागली. पुढे २४ ऑक्टोबर १६५७ रोजी, ऐन दिवाळीतच मराठ्यांनी कल्याण, भिवंडी काबीज केली आणि तेथे मराठ्यांच्या लढाऊ जहाजबांधणीस सुरवात झाली. त्यावेळी आपल्याकडे कुशल कारागीर व तंत्रज्ञान नसल्यामुळे पोर्तुगीज कारागीर रुई लेंताव्ह व्हियेगश, त्याचा मुलगा फर्नाव्ह व त्याकडील कारागीर यांना कामास ठेऊन या जहाजबांधणीचा श्रीगणेशा करण्यात आला. येथील गोदीच्या (डॉकयार्ड) संरक्षणासाठी दुर्गाडीचा किल्लाही बांधण्यात आला. त्यामुळेच २४ ऑक्टोबर हा दिवस 'मराठा आरमार दिन' म्हणून उत्साहाने साजरा केला जातो, आपण सर्वांनीही तो केला पाहिजे.

## जलदुर्गांची रांग!

आरमाराची उभारणी म्हणजे केवळ जहाजबांधणी करून शिवाजी महाराज थांबले नाहीत तर त्यांनी त्याला शास्त्रीय ज्ञानाची जोड दिली. दर्यावर्दीपणा, किनाऱ्यावरील भूभागाचे महत्त्व, समुद्री किल्ले आणि आरमार यांचे राष्ट्ररक्षणांत असलेले अचूक स्थान या बाबी लक्षात घेऊन महाराजांनी आपली पावले उचलली. धार्मिक चालीरिती झुगारून देऊन आरमार सांभाळणाऱ्या आपल्या मावळ्यांना लढण्याची नवी उमेद दिली. समुद्री लढाईची कोणतीही माहिती नसणाऱ्या आपल्या दर्यावर्दी लोकांना त्यांनी सतत प्रेरणा दिली. छाप्यांमधून मिळणारा बहुतांश पैसा किल्ले, आरमार यांची बांधणी व शस्त्रास्त्र निर्मितीसाठी खर्च केला. खांदेरी, कुलाबा, पद्मदुर्ग, सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग अशी जलदुर्गांची रांगच पश्चिम किनाऱ्यावर त्यांनी उभी केली. एवढेच काय, तर गोवा, कर्नाटक व दक्षिणेकडील प्रांतांतील समुद्रकिनाऱ्यावरील किल्ले व बंदरे ही त्यांनी हस्तगत केली. शिवरायांनी समुद्री व्यापाराला व सावकारांना देखील बरेचसे प्रोत्साहन दिले. पोर्तुगीज, इंग्रज, डच, फ्रेंच यांच्याशी स्नेहाचे संबंध ठेवले. त्यांच्यावर वचक ठेवला, मात्र त्यांना दुखावले नाही. आपल्या येथील व्यापाऱ्यांना मोखा, कोंगो (इराण), पर्शिया, मस्कत व इतर ठिकाणी व्यापारानिमित्त जाण्यास प्रोत्साहन दिले.

## महाराजांच्या आरमारी मोहिमा...

आरमाराची उभारणी झाल्यानंतर अवघ्या आठ वर्षांमध्येच फेब्रुवारी १६६५मध्ये महाराजांनी समुद्रावरील बलाढ्य पोर्तुगीजांना व आदिलशाहीला शह देण्यासाठी 'बसरूर' येथे आरमारी मोहीम काढली. बसरूरची ही मोहीम भारताच्या एकूणच सागरी परंपरेमध्ये मानाचे पान ठरलेली आहे. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्ये स्वतः एखाद्या राजाने नेतृत्व करून काढलेली ही बहुधा पहिलीच मोहीम! या मोहिमेबाबत शिवरायांनी कुणासही सुगावा लागू न देता मोहीम यशस्वी केल्याने आजअखेर या मोहिमेबाबत फारशी कुणासही माहिती नाही. त्यावेळची राजकीय पार्श्वभूमी पाहता शिवरायांचे या मोहिमेमागील चातुर्य, धाडस तत्परता आपल्या लक्षात येते. केळदीचे कर्तबगार राजे शिवाप्पा नाईक यांचे निधनानंतर त्यांच्या वारसांमध्ये चालू असलेल्या सत्तासंघर्षाचा विरोधक फायदा उठविण्याच्या आत महाराजांनी ही मोहीम तातडीने पूर्णत्वास नेली. पोर्तुगीजांच्या ताब्यातील मुंबई बेट इंग्रजांना देण्यासाठी गोव्यातील पोर्तुगीज ८ फेब्रुवारी १६६५ रोजी मुंबईला जाणार होते. म्हणून या आरमारी मोहिमेतील सर्वांत मोठा अडसर असलेले पोर्तुगीज आरमार निघताच, ३ मोठी व ८५ छोटी जहाजे घेऊन शिवाजी महाराज मालवण जवळील मालोंड येथील बंदरावरून निघाले. पुढे बसरूर, गांगुळी, भटकळ, होन्नावर, गोकर्ण, कुमठा, अंकोला, कारवार, कद्रा याठिकाणी असलेल्या बंदरांवर छापा मारून लूट मिळविली. गोकर्ण येथील श्री महादेवाचे दर्शन घेऊन तेथे पुष्कळ दानधर्म देखील केला. कारवारला येताच महाराजांनी छोट्या तरांड्या नदी ओलांडण्यासाठी मागे ठेऊन लुटीसह आपले सर्व आरमार परत पाठवून दिले.

अत्यंत शिस्तबद्ध, पूर्णपणे नियोजन करून केवळ १६ ते १७ दिवसांमध्ये ही मोहीम पूर्ण करण्यात आली. २४ फेब्रुवारी रोजी महाराजांनी कारवार सोडले व कद्रा, भिमगड, आंबोली घाटामार्गे महाराज राजगडला आले. महाराजांनी केळदीच्या राज्यास केलेल्या मदतीमुळे व त्यांच्यात झालेल्या तहामुळे येथून मराठ्यांना नियमितपणे खंडणी तर मिळत होतीच, पण पुढे केळदीच्या राणीने औरंगजेबाशी शत्रूत्व पत्करून छत्रपती राजाराम महाराजांना जिंजीकडे निसटून जाण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य केले. अनेक वर्षांची परंपरा असणाऱ्या युरोपीय आरमारांपेक्षा शस्त्रास्त्रे व शास्त्रीय ज्ञान याबाबतीत मराठा आरमार कनिष्ठ दर्जाचे होते. इ.स. १६५७-५८मध्ये आरमाराची बांधणी केल्यानंतर केवळ ८ ते ९ वर्षांमध्ये एवढी मोठी सागरी मोहीम आखायची, म्हणजे धाडसच म्हटले पाहिजे. या मोहिमेमुळे समुद्री परीक्षेत नव्याने स्थापित झालेले मराठा आरमार मोठ्या गुणसंख्येने उत्तीर्ण झाले, हे निश्चित.

## समुद्रामध्येही एक लष्कर जाहले...

मराठा आरमाराचा धुव्वा उडविण्याची भाषा बोलणारे इंग्रज-पोर्तुगीज पुढे मराठ्यांशी सलोख्याची बोलणी करू लागले. ''तो आता बलिष्ठ झाला आहे, त्याला दुखवून चालणार नाही. बरं झालं शिवाजी सह्याद्रीवर जन्मला, समुद्राकडे जन्मला असता तर आमचे काही खरं नव्हतं,'' हे इंग्रजांच्या पत्रांमधील त्यांच्या उल्लेखांवरून हे सिद्ध होते. पुढे मुंबईजवळील खांदेरी बेटावर महाराजांनी किल्ला बांधण्यास सुरवात केली. त्यावेळी इंग्रज व सिद्दीच्या सैन्याला मराठ्यांनी चांगलीच दहशत बसविली. यामुळे मोगल-आदिलशहा यांचेबरोबरच पोर्तुगीज, इंग्रज, डच यांनी महाराजांचा इतका धसका घेतला की, जमिनीपेक्षा पाण्यावरच मराठ्यांची त्यांना जास्त भीती वाटू लागली. 'शिवाजीचे शरीर हवामय असून त्याला पंखही आहेत, कारण तो एकावेळी अनेक ठिकाणी अवतीर्ण होऊ शकतो.' असे शत्रू म्हणू लागले. शिवाजी महाराजांच्या आज्ञेने रामचंद्रपंत अमात्य यांनी लिहिलेल्या आज्ञापत्रामध्ये आरमारावर स्वतंत्र प्रकरणच आहे, त्यामध्ये लिहिले आहे, 'आरमार म्हणजे स्वतंत्र येक राज्यांगच आहे... ज्याजवळ आरमार, त्याचा समुद्र याकरिता आरमार अवश्यमेव करावे.' एवढे आरमाराचे महत्त्व आहे. बखरीमध्ये लिहिले आहे, 'कित्येक पाणियांतील डोंगर बांधून दर्यामध्ये गड बसविले. दरियास पालाण राजियांनी घातले.... समुद्रामध्येही एक लष्कर जाहले....' तसेच बखरीतच एक वाक्य आहे, की सत्तावीस पातशाह्या पाणियामध्ये आहेत. एवढ्या शत्रूंशी शिवाजी महाराजांना तोंड द्यायचे होते. ही गोष्ट साधी-सोपी नव्हती. त्यामुळे शिवाजी महाराजांनी युद्धशास्त्राच्या दृष्टीने आरमाराकडे विशेष लक्ष पुरविले.

## इंग्रज-पोर्तुगीज-डचांचा धुव्वा

शिवाजी महाराजांनंतर असामान्य ताकद व दुर्दम्य इच्छाशक्ती असणारी आरमारी तरुण पिढी पुढे आली आणि तिने जोमदार इतिहास निर्माण केला. औरंगजेबाने दक्षिणेत येऊन भूप्रदेश जिंकून घेतला तरी त्याच्याकडे प्रबळ आरमार नसल्यामुळे समुद्रावर अखेरपर्यंत मराठ्यांचीच सत्ता राहिली. त्याच पुढील पिढींपैकी आंग्रे-धुळप यांनी सागरावरील मराठ्यांची सत्ता व प्रतिष्ठा वाढविली. आंग्रेंनी ५१ प्रकारच्या उत्तमोत्तम जहाजबांधणीबरोबरच तोफा बनविण्याचा आधुनिक कारखानाही येथे उभारला. ज्या युरोपियनांचे कार्ताझ (परवाने) घेऊन आपल्याला समुद्री प्रवास करावा लागे, त्यांनाच कौल व दस्तक (परवाने) घेण्याची सक्ती करण्यात आली. जशी दऱ्याखोऱ्यांची-घाटमाथ्यांची माहिती मराठ्यांना होती तशीच समुद्राची इत्थंभूत माहिती मराठ्यांना होती. या आरमाराच्या जोरावर मराठ्यांनी समुद्रावरील सर्वच सत्ताधिशांना सळो की पळो करून सोडले. जसे मराठ्यांचे पराक्रमी सरदार 'संताजी-धनाजी' यांनी शत्रूला जमिनीवर सळो-की-पळो करून सोडले, तसेच 'संभाजी व तुळाजी आंग्रे' यांनी बलाढ्य आरमारी शत्रूंना समुद्राचेच पाणी पाजले. ज्यांचे आरमार संपूर्ण जगभरात नावाजले जाई, ज्यांच्या सशस्त्र जहाजांपुढे कोणतेही जहाज टिकत नसे अशा इंग्रज-पोर्तुगीज-डच यांच्या आरमाराचा मराठा आरमाराने साफ धुव्वा उडविला.

(लेखक आरमाराचे व इतिहासाचे अभ्यासक आहेत)

